महाराष्ट्र महानगरपालिका व महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियमातील तरतूदींनुसार मुद्रांक शुल्कावरील देय अधिभारात सवलत देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.एमसीओ-२०२०/प्र.क्र.११९/नवि-१४,**
मंत्रालय, मुख्य इमारत (४ था मजला),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक ३१ ऑगस्ट, २०२०.

प्रस्तावना:-

महाराष्ट्र मुंद्राक अधिनियमाच्या कलम ९ च्या खंड (अ) अन्वये लोकहितास्तव मुद्रांक शुल्क दर व मुद्रांक शुल्कावर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांसंदर्भात आकारला जाणारा अधिभार कमी करणे संदर्भातील बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र मुंद्राक अधिनियमाच्या कलम ९ च्या खंड (अ) अन्वये लोकहितास्तव मुद्रांक शुल्क दर व मुद्रांक शुल्कावर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांसंदर्भात आकारला जाणारा अधिभार कमी करण्याबाबत मा.मंत्रीमंडळाने दि.२६.०८.२०२० रोजीच्या बैठकीत निर्णय घेतला आहे. सदर निर्णयाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे कळविण्यात येत आहे:-

"महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ च्या कलम १४७(अ) अन्वये नगरपालिका क्षेत्रात व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४९(अ) अन्वये महानगरपालिका क्षेत्रात स्थावर मालमत्तेच्या अनुषंगाने आकारण्यात येणाऱ्या मुद्रांक शुल्कावरील अधिभार दि.०१.०९.२०२० ते दि.३१.१२.२०२० या कालावधीकरीता १ टक्का इतका कमी तसेच, दि.०१.०१.२०२१ ते दि.३१.०३.२०२१ या कालावधीकरीता १/२ (अर्धा) टक्के इतका कमी करण्यात येत आहे."

२. उपरोक्त अनुषंगाने वैधानिक तरतूदी विषयक आवश्यक कार्यवाही करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८३११४४६२९९९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sachin Dattatray Sahasrabuddhe

Digitally signed by Sachin Dattatray Sahasrabuddhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=7db996f7c088dbf2d76ad85484362957aab596e46ec268eca3b9822aa62fd32b,
serialNumber=67648ad8c40ecf8d0f911eaf72d918202f02f540836a5f65e8b71c0a69d61291, cn=Sachin Dattatray Sahasrabuddhe
Date: 2020.08.31 14:48:07 +05'30'

**(सचिन द. सहस्त्रबुध्दे)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत: -**

१. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
२. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
३. मा.विधानसभा/ मा.विधानपरिषद, सदस्य (सर्व)
४. मा.राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
५. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव महोदयांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.मंत्री(नगर विकास)महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.राज्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर
१२. महालेखापाल, लेखापरिक्षा, महाराष्ट्र -१/२,मुंबई/ नागपूर
१३. संचालक, लेखा व कोषागारे
१४. नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१६. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक (सर्व)
१७. जिल्हाधिकारी (सर्व)
१८. सर्व आयुक्त, महानगरपालिका(बृहन्मुंबई वगळून).
१९. सह सचिव(नवि-१६/नवि-३२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. सह / उप सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. सर्व मुख्याधिकारी (नगरपरिषदा व नगरपंचायती)
२२. निवडनस्ती (नवि-१४)